एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाकरिता आर्थिक वर्ष सन २०२२-२३ साठी यशदा, पुणे या संस्थेस अनुदान वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. बीयुडी-२०२२/प्र.क्र.२४/सीपीटीपी-अ**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- २८/०३/२०२३

वाचा :-१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक-टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४ /१३/१२-अ, दिनांक २०/०१/२०१४
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४/०४/२०२२
३) यशदा, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्रमांक सीपीटीपी प्रशा/१२५/०९ /२१/१३८३, दिनांक ०८/०२/२०२३
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक-बीयुडी-२०२२/प्र.क्र.२४ सीपीटीपी-अ, दिनांक २२/०२/२०२३

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि. २०/०१/२०१४ नुसार शासन सेवेमध्ये सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ आणि गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यासाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी) राबविण्यात येत असून प्रशिक्षणासाठी प्रतिदिन प्रति प्रशिक्षणार्थी उपलब्ध करुन द्यावयाचा निधी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक ०८/०८/२०१४ अन्वये निश्चित करण्यात आला आहे. त्यानुसार सन २०२२-२३ या अर्थसंकल्पीय वर्षात सीपीटीपी-७ व ८ च्या अनिवार्य संलग्नता व महाराष्ट्र अभ्यास दौरा व दिल्ली अभ्यास दौरा या प्रशिक्षणाच्या टप्प्यासाठी यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा) यांनी रु. १,०१,१५,०००/- इतक्या निधीची मागणी संदर्भ क्रमांक ३ येथील पत्रान्वये केली होती. त्यापैकी रु. ६६,९९,८४०/- इतका निधी संदर्भ क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये यशदा, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात आला आहे. उर्वरित रु. ३४,१५,१६०/- इतका निधी यशदा, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गत सीपीटीपी-७ व सीपीटीपी-८ चे प्रशिक्षणाकरिता रु. ६६,९९,८४०/- इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला असून उर्वरित रु. ३४,१५,१६०/- इतका निधी बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यास वित्त विभगाने मान्यता दिली आहे.

२. आता सदर शासन निर्णयान्वये यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेस "लेखाशीर्ष-ए-४, २०७० इतर प्रशासकीय सेवा ००-००३ प्रशिक्षण (००)(१२) यशदा, पुणे या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहायक अनुदाने (२०७०००८७१)" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षात ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) करिता **रु. ३४,१५,१६०/- (रुपये चौतीस लाख पंधरा हजार एकशे साठ फक्त)** इतका निधी वितरित करण्यास पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे:-

अ. सदर प्रयोजनासाठीचा खर्च वितरित अनुदानाच्या मर्यादेत ठेवावा व प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकीच देयके कोषागारातून आहरित करण्याची दक्षता घ्यावी.

आ. प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकी देयके कोषागारात सादर करुन रक्कम आहरित केल्यानंतर आहरित केलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

इ. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा खर्च ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

ई. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे यांना वितरित करण्यात आलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) त्यांनी महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर व शासनाला सादर करावे.

उ. तसेच यशदा, पुणे यांनी सदर अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके ठेवण्यात यावीत. सदर लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर यांना राहतील.

ऊ. वित्त विभागाच्या दिनांक ०४/०४/२०२२ व दिनांक ०८/०२/२०२३ च्या शासन निर्णयातील नमूद अटी/ शर्तींचे पालन करुन सदर निधी खर्च करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १७७६, दिनांक १३/०३/२०२३ मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२८१४५७५४१७०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNILSING SHIVAJI NIKAM

Digitally signed by SUNILSING SHIVAJI NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=b98ce938374a86717bb5977ddbce16908e9c51533d252564989be91f4b805764, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F77D903492F7578562D032FA9F7E1FA812CB18DAF3AEE53AF4AA4E8A0B74337E, cn=SUNILSING SHIVAJI NIKAM
Date: 2023.03.28 15:02:58 +05'30'

**( सु. शि. निकम )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे
४. लेखाधिकारी, यशदा, पुणे (३ जादा प्रतीसह)
५. जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे
६. वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई
७. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५, मुंबई-३२
८. निवडनस्ती.